**सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध कल्याणकारी योजनांची प्रसिद्धी व प्रचार हा समाजाच्या सर्व स्तरांच्या लोकांपर्यंत प्रभावीपणे पोहोचविण्याकरीता शासनामार्फत केलेल्या जाहीरातींचे प्रलंबित देयके अदा करण्यासाठी आरोग्यविषयक प्रसिध्दी केंद्रे (२२१०१०४४), २६- जाहीराती व प्रसिध्दी या उद्दिष्टाखाली रु.१०८७.०० लक्ष एवढा निधी वितरीत करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

### शासन निर्णय क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र. ५२/अर्थसंकल्प,

गोपालदास तेजपाल रुग्णालय आवार, नविन मंत्रालय
मुंबई - ४०० ००१.
दिनांक: २९ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र. ५५/ अर्थसंकल्प दि.२९.०९.२०२४**
२) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४ व दि. १७.०३.२०२५.**

**प्रस्तावना -**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध कल्याणकारी योजनांची प्रसिद्धी व प्रचार हा समाजाच्या सर्व स्तरांच्या लोकांपर्यंत प्रभावीपणे पोहोचविण्याकरीता शासनामार्फत केलेल्या जाहीरातींचे प्रलंबित देयके अदा करण्यासाठी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

२. वाचा मधील अनु. क्र. १ येथील दि.२६.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षामध्ये सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत राबविण्यात येणाऱ्या विविध कल्याणकारी योजनांची प्रसिद्धी व प्रचार हा समाजाच्या सर्व स्तरांच्या लोकांपर्यंत प्रभावीपणे पोहोचविण्याकरीता रु. ११३९.८८ लक्ष एवढ्या रकमेचा माध्यम आराखडा राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर रु. ११३९.८८ लक्ष रकमेपैकी रु.१०८६.९३ लक्ष इतक्या रकमेची प्रत्यक्षात जाहिरात करण्यात आली आहे.

३. सदर प्रकरणी नियोजन विभाग व वित्त विभागाने रु. १०८६.९३ लक्ष एवढा निधी वितरणास मान्यता दिली आहे. त्याप्रमाणे “(०१) (०२) आरोग्यविषयक प्रसिध्दी केंद्रे (२२१०१०४४), २६- जाहीराती व प्रसिध्दी” या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीत झालेला व वित्त विभागाकडून BEAMS प्रणालीवर प्राप्त

झालेला रु.१०८६.९३ लक्ष एवढा निधी पुढीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे:-

**(रुपये लाखात)**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | नियंत्रक अधिकारी | वितरीत अनुदान |
|---|---|---|---|
| १ | **मागणी क्रमांक आर -१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य** "(०१) (०२) आरोग्यविषयक प्रसिध्दी केंद्रे (२२१०१०४४), २६- जाहीराती व प्रसिध्दी" | **सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ. व प्रशासन) पुणे (R०००२)** | **१०८७.००** |

४. सदरचा निधी प्रशासकीय अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे यांनी खालील तक्त्यात नमूद केलेली देयके अदा करण्यासाठी खर्च करण्याचे आदेशीत करण्यात येत आहे:-

(आकडे रुपयात)

| अ.क्र. | कंपनी चे नाव | माध्यम | एकूण कार्यादेश रक्कम (१८ टक्के जीएसटी सह) | एकूण देयक रक्कम (१८ टक्के जीएसटी सह) |
|---|---|---|---|---|
| १ | मे.जीएसपीके कन्सल्टंसी | दृकश्राव्य (TVC) आणि श्राव्य (Audio Jingle) निर्मिती | **२,२४,६०,१२०** | **२,२४,६०,१२०** |
| २ | मे.जीएसपीके कन्सल्टंसी | समाज माध्यम व डिजीटल माध्यम | **३,२३,२६,१००** | **३,२३,२६,१००** |
| ३ | मे.शिवम ॲडव्हरटाइझिंग | एसटी स्टँड LED/ LCD Screen | **५,३९,०७,१२०** | **५,३९,०७,१२०** |
| | एकूण | | **१०,८६,९३,३४०** | **१०,८६,९३,३४०** |

५. सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षात वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला उपरोक्त निधी / अनुदान खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे :-

१) ज्या उद्देशासाठी निधी / अनुदान मंजूर करण्यात आला आहे, त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी सदर निधी खर्च करता येणार नाही. तसेच इतर लेखाशिर्षाकडे वळती करता येणार नाही.

२) सदर खर्चाचा प्रगती अहवाल मासिक निधी विवरणपत्रानुसार नियंत्रक अधिकाऱ्यांनी दरमहा १० तारखेपर्यंत शासनास सादर करावा.

३) अनुदान अदा करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियमांचे पालन करावे. तसेच वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अटी व शर्तीचे पालन करुन सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेवून अनुदान अदा करावे.

४) उपरोक्त अटी व शर्ती बरोबरच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तीचे पालन करणे आवश्यक राहील.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७ मार्च, २०२५, नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १३०/१४७२, दि. २५.०३.२०२५ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३४३/२०२५/ व्यय-१३, दि. २९.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमती नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१८३६४४९०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2025.03.29 18:43:34 +05'30'

**(विकास तु. कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ. व प्रशासन), पुणे.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १ / २, मुंबई / नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
७. वित्त विभाग ( कार्यासन व्यय-१३ / अर्थ- ९) मंत्रालय, मुंबई.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४७२), मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती, (कार्यासन अर्थसंकल्प).